**राज्यातील अमराठी शाळांमध्ये इयत्ता ८ वी, ९ वी व १० वी इयत्तेत शिकत असलेल्या अल्पसंख्याक लोकसमूहातील विद्यार्थ्यांसाठी मराठी भाषा फौंडेशन वर्ग योजना सुधारीत स्वरुपात राबविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्र. मभायो-२०१३/प्र.क्र.६७/का-९**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: २७ एप्रिल, २०१५.

**संदर्भ** :- सा.प्र.वि. शासन निर्णय क्र. आरएमएन २००४/४०५/प्र.क्र.३३(दोन)/०४/३५, दि.२ नोव्हेंबर,२००४

**प्रस्तावना :-**

अल्पसंख्याकांच्या कल्याणासाठी पंतप्रधानांच्या नवीन १५ कलमी कार्यक्रमांतर्गत असे प्रतिपादीत करण्यात आले आहे की, शासकीय सेवेतील अल्पसंख्याक उमेदवारांचे प्रमाण वाढविण्याकरीता शासनाकडून जाणीवपूर्वक प्रयत्न केले जातील. मराठी भाषेवर पुरेसे प्रभुत्व नसल्याने राज्यातील अल्पसंख्याक लोकसमूहातील उमेदवार इतर सर्वसाधारण उमेदवारांच्या तुलनेत विविध स्पर्धा परीक्षांमध्ये मागे पडतात.

केंद्रीय लोकसेवा आयोग / महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात येणाऱ्या विविध स्पर्धा परीक्षांमध्ये अल्पसंख्याक उमेदवारांना यशाच्या पुरेशा संधी उपलब्ध करुन देण्याकरीता आणि त्यासाठी मराठी भाषेवर त्यांचे प्रभुत्व निर्माण करण्याकरीता राज्यातील इंग्रजी माध्यम वगळता इतर अमराठी शाळांमध्ये इ.८वी, ९वी, व १० वी मध्ये शिकत असलेल्या अल्पसंख्याक विद्यार्थ्यांकरीता सन २००६ पासून मराठी भाषा फौंडेशन वर्ग योजना राबविण्यात येत आहे.

कालौघात झालेल्या शैक्षणिक व आर्थिक बदलांच्या पार्श्वभूमीवर या योजनेची अंमलबजावणी सुधारीत स्वरुपात करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. सन २०१५-१६ पासून मराठी भाषा फौंडेशन वर्ग योजनेकरीता पुढीलप्रमाणे सुधारीत कार्यपध्दती, योजनेच्या अंमलबजावणीचा कालावधी, योजनेंतर्गत मानसेवी शिक्षकांची नियुक्ती व त्यांचे मानधन, योजनेंतर्गत अभ्यासक्रम आणि योजनेच्या अंमलबजावणीची पध्दती विहीत करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

अ) **मराठी फौंडेशन वर्ग योजनेच्या अंमलबजावणीकरीता सुधारित कार्यपध्दती :-**

अल्पसंख्याक लोकसमूहातील विद्यार्थ्यांचे मराठी भाषेवर प्रभुत्व निर्माण करण्याकरिता राज्यातील मराठी माध्यमेतर शाळेत शिकणाऱ्या इ.८वी,९वी व १०वी च्या अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थ्यांसाठी मराठी भाषा फौंडेशन वर्ग योजना राबविण्यात येत आहे.

शाळांना सुरुवात झाल्यानंतर मे महिन्या अखेरीस किंवा जून महिन्याच्या सुरुवातीला शिक्षणाधिकारी (निरंतर), जिल्हा परिषद यांनी सर्व उर्दु माध्यमिक / मराठी माध्यमेतर शाळांच्या मुख्याध्यापकांची एक बैठक आयोजित करुन संबंधित मुख्याध्यापकांना सदर योजनेबाबत मार्गदर्शन करावे. या योजनेंतर्गत संबंधित शाळांनी इ.८वी, ९वी व १० वी मध्ये शिक्षण घेत असलेल्या अल्पसंख्याक समुदयातील अमराठी विद्यार्थी संख्या, तुकडयांची संख्या, सद्य:स्थितीत शाळेमध्ये असलेल्या मराठी शिक्षकांची संख्या इ. बाबी नमूद करुन मानसेवी शिक्षकांच्या नियुक्तीचा प्रस्ताव अमराठी शाळेच्या मुख्याध्यापकांनी शिक्षणाधिकारी (निरंतर) यांच्या मान्यतेसाठी व शिक्षणाधिकारी (निरंतर) यांनी जिल्हाधिकारी यांचेकडे मान्यतेसाठी सादर करावा.

जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या जिल्ह्यातील संबंधित शाळांकडून शिक्षणाधिकारी (निरंतर) यांच्या मान्यतेने आलेले प्रस्ताव प्राप्त झाल्यानंतर संबंधित शाळेतील विद्यार्थी संख्या, मानसेवी शिक्षकांची शैक्षणिक अर्हता (बी.एड/ एम.एड) विचारात घेऊन प्रस्तावास मंजूरी द्यावी. त्यानंतर शिक्षणाधिकारी (निरंतर) यांच्या मदतीने जिल्हाधिकारी यांनी शिक्षकांची नोंद घेऊन, त्यांचा कालावधी व त्या कालावधीचे त्यांचे मानधन याचे अंदाजपत्रक / माहिती महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास व शासनास सादर करावी.

**ब) योजनेचा कालावधी** :- या योजनेचा कालावधी १ जुलै ते ३१ मार्च असा ९ महिन्यांचा राहील.

**क) शिक्षकांची नियुक्ती** :- शिक्षणाधिकारी (निरंतर) यांनी सदर योजनेंतर्गत विहित अर्हताधारक अतिरिक्त शिक्षकांचे पॅनल तयार करुन त्यातील शिक्षकांच्या मानसेवी तत्वावर नेमणूका करताना पुढीलप्रमाणे विद्यार्थीसंख्या विचारात घ्यावी.

मराठी भाषा फौंडेशन वर्ग योजनेंतर्गत मराठी भाषा हा विषय शिकविण्यासाठी इ.८वी, ९वी व १० वी या तिन्ही वर्गांमध्ये मिळून एकूण १८० ते २०० विद्यार्थ्यांसाठी एक मानसेवी शिक्षक नेमण्यात येईल. २०० पेक्षा जास्त मात्र ३०० पेक्षा कमी असल्यास दोन मानसेवी शिक्षक नेमण्यात येतील आणि त्यापुढील प्रत्येक १५० विद्यार्थी संख्येसाठी एका मानसेवी शिक्षकांची नेमणूक करण्यात येईल. गैरहजर राहणाऱ्या व अशोभनीय वर्तन करणाऱ्या शिक्षकांना बदलणे, त्यांच्या नियुक्त्या रद्द करणे, त्याऐवजी इतर शिक्षकांची नेमणूक करणे इ. बाबी शिक्षणाधिकारी (निरंतर) हे जिल्हाधिकाऱ्यांच्या मान्यतेने करतील.

**ड) शिक्षकांचे मानधन** :- या योजनेंतर्गत नेमणूक झालेल्या शिक्षकाने इ.८वी, ९वी व १० वी च्या विद्यार्थ्यांना शाळेच्या वेळेनंतर अतिरिक्त शिकवणी (Extra Coaching) करणे अपेक्षित असल्याने शिक्षकांना सन २०१५-१६ पासून रु.५०००/- दरमहा देण्यात यावे. सदर मानधन संबंधित

शिक्षकांच्या बँक खात्यामध्ये जमा करण्यात यावे. या व्यतिरिक्त त्यांना कोणतेही लाभ अनुज्ञेय असणार नाही. शैक्षणिक वर्ष संपल्यानंतर या तात्पुरत्या नियुक्त्या आपोआप संपुष्टात येतील. त्यानंतर पुढील शैक्षणिक वर्षासाठी नव्याने नियुक्त्या करण्यात याव्यात.

**इ) अभ्यासक्रम** :-

**१) इयत्ता ८ वी** :- महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ यांनी विहित केलेला इ.८वी साठीचा अभ्यासक्रम (क्रमिक पुस्तक)

**मराठी व्याकरण** :- नाम, सर्वनाम, क्रियापद, विशेषण, क्रियाविशेषण, काळ (भूतकाळ, वर्तमानकाळ, भविष्यकाळ) शब्दांच्या जाती ओळखणे, वाक्प्रचार, साधे वाक्य, केवल वाक्य, संधी वाक्प्रचार, म्हणी त्यांचे अर्थ, वाक्यात उपयोग, निबंध लेखन.

**२) इयत्ता ९ वी**:- महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ यांनी विहीत केलेला इ. ९वी साठीची अभ्यासक्रम (क्रमिक पुस्तक)

**मराठी व्याकरण** :- वाक्प्रचार, म्हणी त्यांचे अर्थ, वाक्यात उपयोग, मराठी उताऱ्याचे सारांश लेखन, उताऱ्यावरील प्रश्न उत्तरे, इंग्रजी उताऱ्याचे मराठीमध्ये भाषांतर, दोन व्यक्तींमधील संवाद, गट चर्चा, भाषण कला, पत्र व्यवहार, निबंध लेखन, अर्ज लेखन, अहवाल / वृतांत लेखन इ.

**३) इयत्ता १० वी** :- महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ यांनी विहित केलेला इ. १० वी साठीचा अभ्यासक्रम (क्रमिक पुस्तक)

**मराठी व्याकरण** :- शब्दांच्या जाती, काळ, वाक्प्रचार, म्हणी त्यांचे अर्थ, वाक्यात उपयोग, मराठी उताऱ्याचे सारांश लेखन, उताऱ्यावरील प्रश्न उत्तरे, इंग्रजी उताऱ्याचे मराठीमध्ये भाषांतर, दोन व्यक्तींमधील संवाद, गट चर्चा, भाषण कला, पत्र व्यवहार, निबंध लेखन, अर्ज लेखन, अहवाल / वृतांत लेखन, निमंत्रण पत्रिका / कार्यक्रम पत्रिका तयार करणे, छोटे भाषण तयार करणे इ. शिक्षणाधिकारी (निरंतर) यांनी महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन परिषदेकडून विद्यार्थ्यांसाठी level gauging test तयार करुन घेण्यात यावी. तसेच दर तिमाहीला विद्यार्थ्यांची level gauging test घेण्यात यावी. यामध्ये पास / नापास विद्यार्थ्यांचा अहवाल जिल्हाधिकारी यांना सादर करावा. तसेच या वर्गासाठीचे विद्यार्थ्यांचे वेगळे हजेरीपत्रक ठेवण्यात यावे. तसेच मानसेवी शिक्षकांच्या मानधनाचे व डायऱ्यांचे मूल्यमापन शिक्षणाधिकारी (निरंतर) यांच्यामार्फत करण्यात यावे. मानसेवी शिक्षकांनी अभ्यासक्रमानुसार शिकविण्याच्या बाबींची डायरीमध्ये शैक्षणिक वर्षातील महिनानिहाय नोंद ठेवावी.

**फ) अंमलबजावणी** :- सदर योजनेची अंमलबजावणी जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांचेकडून शिक्षणाधिकारी (निरंतर) यांच्या मदतीने करण्यात येईल. जिल्हाधिकारी यांनी शिक्षणाधिकारी (निरंतर) यांच्या मदतीने मानसेवी शिक्षकांची नियुक्ती केल्यानंतर सर्व मानसेवी शिक्षकांची नोंद घेऊन, त्यांचा कालावधी व त्या कालावधीचे त्यांचे वेतन याचे अंदाजपत्रक / माहिती महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास व शासनास सादर करावे. आयोगाने सर्व जिल्ह्यांसाठी एकत्रित निधी मागणीचा प्रस्ताव शासनास सादर करावा. शासनाकडून निधी प्राप्त झाल्यानंतर आयोगाने संबंधित जिल्हाधिकाऱ्यांना अनुज्ञेय असणारा निधी वितरीत करावा. जिल्हाधिकाऱ्याकडून अनुदान प्राप्त झाल्यानंतर शिक्षणाधिकारी (निरंतर) यांनी प्रत्येक जिल्ह्यात या योजनेसाठी संबंधित शाळांना अनुदानाचे वाटप करावे. तसेच त्यांनी शिकवणी वर्गांना दर दोन महिन्यांनी अचानक भेटी देवून शिक्षकांचे तसेच विद्यार्थ्यांचे हजेरीपत्रक तपासणी करावी व याचा अहवाल शासनास सादर करावा.

अनुदानाचा हिशेब ठेवणे, शाळा / संस्थांकडून उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेऊन जिल्हाधिकारी यांच्या मान्यतेने महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास सादर करावे इ. कामे पार पाडावीत. सदर योजनेच्या प्रगतीबाबत शासनास प्रति वर्षाचा अहवाल / अभिप्राय माहे एप्रिल महिन्यात शासनास सादर करावे.

शासनाकडून दरवर्षी शाळांना ८ वी, ९ वी व १०वी च्या तुकड्यांना मान्यता मिळाली त्याबाबत नोंद घेवून पुढील वर्षी त्या शाळांचा या योजनेमध्ये समावेश करण्यात यावा. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने त्या शैक्षणिक वर्षाच्या ३० एप्रिल अखेरपर्यंत सर्व जिल्हाधिकारी व शिक्षणाधिकारी (निरंतर) यांच्याकडून निधीची उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त करुन घेवून, त्याआधारे एकत्रित उपयोगिता प्रमाणपत्र आयोगास व शासनास सादर करावे, त्याशिवाय शासनामार्फत पुढील वर्षाचा निधी वितरीत करण्यात येऊ नये.

२. सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी सन २०१५-१६ या शैक्षणिक वर्षापासून सुरु होईल.

३. या योजनेवरील खर्च "मागणी क्रमांक २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८, ३१ सहायक अनुदाने" या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतुदींमधून भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४५२७६, दि. ७ सप्टेंबर,२०१३ व नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२७३/ का१४७१, दि.२८

ऑक्टोबर, २०१३ आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.११२६/१४/व्यय-४, दि.२२ डिसेंबर,२०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यायत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१५०४२८१०५८१५७६१४ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ashok Hari Gaikwad

Digitally signed by Ashok Hari Gaikwad
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ashok Hari Gaikwad
Date: 2015.04.28 11:14:48 +05'30'

**( अशोक गायकवाड )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,

२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

३. मा.मंत्री/ राज्यमंत्री (अल्पसंख्याक विकास) यांचे खाजगी सचिव,

४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,

५. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,

६. महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,

७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

९. संचालक, तंत्रशिक्षण, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंुबई,

१०. आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, मुंबई,

११. कक्ष अधिकारी, वित्त विभाग(व्यय-४/अर्थ-१४), मंत्रालय, मुंबई,

१२. निवडनस्ती.